शासकीय कर्मचाऱ्यांच्या मान्यताप्राप्त संघटना
संघटनेचे पदाधिकारी व कार्यकारिणीचे
सभासद यांना संघटनात्मक कार्यासाठी
विशेष नैमित्तिक रजा --

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग,
क्रमांक : आरजीए-१०९५/११/प्र.क्र.२/९५/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ फेब्रु., १९९५.

पहा :- १) शासन निर्णय, क्र.आरजीए-१०८४/२७६/सीआर-२०/
१६-अ, दि.२५.१०.८५
२) शुध्दीपत्र क्र.आरजीए-१०८४/२९०६/सीआर-२०/
१६-अ, दिनांक १८ डिसेंबर, १९८५.

शासन निर्णय :-

शासन मान्यताप्राप्त संघटनेच्या मुख्य शाखेतील पदाधिकाऱ्यांना व कार्यकारिणीच्या सभासदांना उपरोक्त शासन निर्णयान्वये अनुक्रमे १० व ७ दिवसांची विशेष नैमित्तिक रजा मंजूर करण्यास हरकत नसल्याचे स्पष्ट केलेले आहे. तथापि, सदर निर्णयामध्ये पदाधिकाऱ्यांच्या विशिष्ट पदनामांचा उल्लेख असल्याने मुख्य शाखेच्या सर्व पदाधिकाऱ्यांना ही रजा देण्यात येत नाही. यास्तव पूर्वीच्या आदेशामध्ये अंशत: बदल करून पुढील प्रमाणे स्वयंस्पष्ट सुधारित आदेश देण्यात येत आहेत की, शासन मान्यताप्राप्त संघटनेच्या फक्त मुख्य शाखेच्या पदाधिकाऱ्यांना व कार्यकारिणीच्या सभासदांना प्रत्येक कॅलेंडर वर्षामध्ये खालीलप्रमाणे विशेष नैमित्तिक रजा मंजूर करण्यास हरकत नसावी.

| मान्यताप्राप्त संघटनेचे | एका कॅलेंडर वर्षामध्ये अनुज्ञेय असलेली विशेष नैमित्तिक रजा |
|---|---|
| १) मुख्य शाखेचे पदाधिकारी | १० दिवसांपर्यंत |
| २) कार्यकारिणीचे सभासद (वरील १ मधील पदाधिकाऱ्यांव्यतिरिक्त) | ७ दिवसांपर्यंत |

२. वरील प्रमाणे विशेष नैमित्तिक रजा शासन मान्यताप्राप्त संघटनांच्या मुख्य शाखेच्या कार्यकारिणीच्या सभासदांना व पदाधिकाऱ्यांनाच देता येईल. संघटनांच्या शाखांच्या पदाधिकाऱ्यांना ही सवलत उपलब्ध असणार नाही.

३. संघटनेने वेळोवेळी पदाधिकाऱ्यांची व कार्यकारिणीच्या सभासदांची यादी संबंधित कार्यालयातील रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यांना पाठविणे आवश्यक आहे. तसेच ही विशेष नैमित्तिक रजा संबंधितांना सक्षम अधिकाऱ्यांकडून पूर्वानुमतीने मंजूर करून घेणे आवश्यक आहे.

४. ज्या व्यक्तींना संघटनेचे पदाधिकारी म्हणून विशेष नैमित्तिक रजा देय असेल त्यांना कार्यकारिणीचे सभासद म्हणून वेगळी नैमित्तिक रजा मिळू शकणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

( शि.शा.हिरीजगनेर )

उप सचिव,

सामान्य प्रशासन विभाग

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हाधिकारी,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई.
विविध मंत्रालयीन विभागाच्या प्रशासनिक अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख.
शासकीय कर्मचाऱ्यांच्या (औद्योगिकेतर) शासन मान्यताप्राप्त सर्व संघटना यांना संबंधित प्रशासकीय विभागामार्फत